**अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाकरिता रु.७७.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अपाम- २०२४/प्र.क्र.११८/का.१४२५-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २७ मार्च, २०२५.

**वाचा :-**

(१) वित्त विभाग, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५.०७.२०२४
(२) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्रमांक: अपाम-२०२४/प्र.क्र.११८/का-१४२५-अ, दि.२८.०६.२०२४
(३) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्रमांक: अपाम-२०२४/प्र.क्र.११८/का-१४२५-अ, दि.२६.०९.२०२४
(४) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्रमांक: अपाम-२०२४/प्र.क्र.११८/का-१४२५-अ, दि.०५.०२.२०२५
(५) अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादित,मुंबई यांचे पत्र क्र.APM/ADM/Fund.demand/११२८/२०२४-२५,दि.१०.०३.२०२५

**प्रस्तावना:**

अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळामार्फत सद्य:स्थितीत कार्यान्वित असलेल्या योजनांच्या अंमलबजावणीकरीता आर्थिक वर्ष २०२४-२५ करिता रु.४००.०० कोटीचा निधी शासनाने अर्थसंकल्पित केला आहे.

या अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.४००.०० कोटी तरतुदीपैकी शासन निर्णय दिनांक २८.०६.२०२४ अन्वये रु.१३०.०० कोटी निधी, शासन निर्णय दिनांक २६.०९.२०२४ अन्वये रु.९५.०० कोटी निधी तसेच शासन निर्णय दिनांक ०५.०२.२०२५ अन्वये रु.९८.०० कोटी निधी असे एकूण रु.३२३ कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे. महामंडळाने केलेल्या मागणीप्रमाणे उर्वरीत रु.७७.०० कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळास या आदेशान्वये रु.७७.०० कोटी (रुपये सत्याहत्तर कोटी फक्त ) इतका निधी खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) व्यवस्थापनावरील खर्च मर्यादीत ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.
२) विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशिलवार माहिती व त्यावर केलेला खर्च यांची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.
३) कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.
४) सदरचा निधी खर्च करताना राज्य शासनाची कार्यनियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पिय नियम पुस्तिकेतील तरतुदी सर्व अटी व शर्ती इ.अनुपालन करुन निधीचा विनियोग

करावा. तसेच खर्च करताना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

५) सदर खर्च केल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी शासनास व संबंधितांना सादर करण्याची जबाबदारी ही व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्या.,मुंबई यांची राहील.

६) याबाबत वेळोवळी खर्चाचा ताळमेळ घेवून त्याबाबतची माहिती महालेखापाल यांना महामंडळाने द्यावी.

७) सदरचा निधी दि.३१.०३.२०२५ पर्यंत निश्चितपणे खर्च होईल याची खात्री करावी. सदर निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता बँक खात्यात,स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.

८) तसेच निधी आहरित करुन बँक/स्वीय प्रपंजी खात्यात ठेवला असल्यास असा खर्च न होणारा निधी शासन खाती जमा करण्यात यावा.

२. अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळास रु.७७.०० कोटी (रुपये सत्याहत्तर कोटी फक्त ) आहरित व संवितरित करण्यासाठी "सह सचिव / उप सचिव (का-१४२५-अ),नियोजन विभाग" हे "नियंत्रक अधिकारी" राहतील. तसेच "कार्यासन अधिकारी (का-१४२२) ,नियोजन विभाग" हे "आहरण व संवितरण अधिकारी" असतील. सदर अनुदान महाराष्ट्र कोषागार नियम ४४ मधील नमुन्यातील देयकान्वये अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ, मुंबई यांस संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत. अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ,मुंबई यांस सदर आदेशान्वये वितरीत करण्यात येणारे भांडवली अंशदान हे सशर्त अनुदान आहे.

३. या बाबींवर होणारा खर्च हा सन २०२४-२५ साठीच्या असलेल्या "ओ-१०, ४२५०, इतर सामाजिक सेवा यावरील भांडवली खर्च, ००, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (००)(००)(०१) अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्या. यांस भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२५०ए०७२) ३२,अंशदाने या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदरचा शासन निर्णय हा वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. १८५/२०२५/व्यय ८, दिनांक १८/०३/२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५.०७.२०२४ व दि.१७.०३.२०२५ च्या तरतुदीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२५०३२७१७४८०४०८१६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK BANSI GAIKWAD

Digitally signed by VIVEK BANSI GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2dcd8a369b90c95da2ba1482ac5185a9b5d5d8a62596d71411bc96a1a7d9bad5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1ECC1A130CD0429F39A57C63D4B57C6C3ACFCA13C103BFF9F5EF5D51BD17AD08, cn=VIVEK BANSI GAIKWAD
Date: 2025.03.27 17:58:49 +05'30'

**( विवेक ब.गायकवाड )**

**सह सचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई

३. मा.उपमुख्यमंत्री (नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४. अपर मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई.
५. अपर मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
६. प्रधान महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपुर
७. व्यवस्थापकीय संचालक,अण्णासाहेब पाटील आर्थिक विकास महामंडळ मर्या.,मुंबई
८. सह / उप सचिव ,वित्त विभाग, कार्यासन व्यय-८/अर्थ-३,१६ )
९. सह संचालक,लेखा व कोषागारे,संगणक कक्ष,नवीन प्रशासन भवन,५ वा मजला,मुंबई
१०.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
११.निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
१२.जिल्हा कोषागार अधिकारी,मुंबई
१३.कार्यासन १४२२ /१४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती कार्यासन १४२५-अ